**भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील श्रीमती प्रियंका उमेश वाठ, कनिष्ठ भूवैज्ञानिक यांची विनंती बदली.**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन आदेश क्रमांकः आपना-२०१५/प्र.क्र.२२०/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई- ४०० ००१.
तारीख: ०६ एप्रिल, २०१७.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांचे बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदींनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील श्रीमती प्रियंका उमेश वाठ, कनिष्ठ भूवैज्ञानिक यांची खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे विनंती बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | पदनाम | सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे कार्यालय |
|---|---|---|---|---|
| १ | श्रीमती प्रियंका उमेश वाठ | कनिष्ठ भूवैज्ञानिक | जिल्हा परिषद, रत्नागिरी | जिल्हा परिषद, वर्धा |

सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. वर नमूद अधिकाऱ्यांच्या बदली आदेशाची तात्काळ अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने सर्व संबंधितांनी पुढील सूचनांचे कटाक्षाने पालन करावे.

(१) बदली झालेल्या अधिकाऱ्यास/ कर्मचाऱ्यास संबंधित कार्यालय प्रमुखाने तात्काळ कार्यमुक्त करून तसे संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांना कळवावे. तसेच बदली झालेल्या अधिकारी/ कर्मचारी यांनी त्यांची पदस्थापना केलेल्या कार्यालयात तात्काळ रुजू व्हावे.

(२) बदली झालेला अधिकारी बदलीच्या ठिकाणी संबंधित कार्यालयात रुजू होण्यासाठी आल्यानंतर त्यास विनाविलंब हजर करून घ्यावे, अन्यथा संबंधित कार्यालय प्रमुखास जबाबदार धरण्यात येईल.

(३) बदली आदेशात बदल करून घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणल्यास संबंधित अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र राहील.

(४) उपरोक्त बदली ही संबंधितांच्या विनंतीनुसार करण्यात येत असल्याने त्यांना त्यांच्या बदलीच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी पदग्रहण अवधी तसेच कोणत्याही प्रकारचा प्रवास भत्ता अथवा अनुषंगिक भत्ते अनुज्ञेय असणार नाहीत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201704051735559828 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2017.04.06 14:08:52 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वचाता विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, शिवाजीनगर, पुणे.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी/ वर्धा.
५. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
६. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नागपूर विभाग, नागपूर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी, वर्धा.
८. श्रीमती प्रियंका उमेश वाठ, कनिष्ठ भूवैज्ञानिक, जिल्हा परिषद, रत्नागिरी (संचालनालयामार्फत)
९. निवडनस्ती (कार्यासन, पापु-१५)